सन २०१८-१९ मध्ये राज्यस्तरीय महालक्ष्मी सरस विक्री प्रदर्शन आयोजित करण्यासाठी निधीचे वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अर्थसं २०१८/प्र.क्र.१३०/योजना-१**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ००१**
**दिनांक: ०२ फेब्रुवारी, २०१९**

वाचा :

**शासन निर्णय क्रमांकः पणन-२००८/प्र.क्र.७३८/योजना-१,दिनांक २७ फेब्रुवारी, २००९**

**शासन निर्णय :**

शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्रमांक : पणन - २००८/प्र.क्र.७३८/योजना-१, दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ अन्वये स्वयंसहाय्यता बचत गटाच्या उत्पादित मालाची विक्री व प्रदर्शनासाठी राज्यस्तरावर भरविण्यात येणा-या महालक्ष्मी सरस प्रदर्शनासाठी रु.५०.०० लक्ष इतके अर्थसहाय्य देण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. सदर प्रदर्शनासाठी सन २०१८-१९ मध्ये आवश्यक निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात राज्यस्तरीय महालक्ष्मी सरस विक्री प्रदर्शन आयोजित करण्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जि.प. ठाणे यांना एकूण रू. ५०.०० लक्ष (अक्षरी रूपये पन्नास लक्ष मात्र) इतका निधी आहरित करण्यासाठी अर्थसंकल्पिय वितरण प्रणाली (BDS) व्दारे वितरीत करण्यात येत आहे. तसेच सदर निधी आहरित करण्यासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांना आहरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहेत. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे यांनी कोषागारातून निधी आहरित करून मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांचेकडे सूपूर्द करण्यात यावा.

३. सदरचा खर्च “मागणी क्रमांक एल-३, "२५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) सुवर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) (०४) प्रदर्शने व कायमस्वरूपी विक्री बांधणे (कार्यक्रम) (२५०१ १९९३) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)"या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१८-१९ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. हे अनुदान ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे अन्यथा ही वित्तीय अनियमितता समजण्यात येईल याची अंमलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी. तसेच संदर्भाधिन दिनांक २७ फेब्रुवारी, २००९ च्या शासन निर्णयातील कार्यपध्दतीचे पालन करावे.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अनुदानाबाबत मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी उपयोगिता प्रमाणपत्र योजना-१ कार्यासनास सादर करावे. तसेच पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी, कार्यासन योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी.

(१) मंजूर केलेली रक्कम, (२) कोषागारातून काढलेली रक्कम, (३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक विअप्र- २०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका - १९७८ भाग-एक, उप विभाग - तीन अनुक्रमांक चार परिच्छेद क्रमांक २७(२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय प्राधिकारान्वये तसेच वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं- २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२ एप्रिल, २०१८ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201902011756021920 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dr. Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr. Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr. Vasant Gopal Mane
Date: 2019.02.02 13:21:19 +05'30'

**(डॉ. वसंत माने)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (ले. व अ.) (ले.प.), महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२ नागपूर
२. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
३. अधिदान व लेखा अधिकारी मुंबई
४. जिल्हा कोषागार अधिकारी/उप कोषागार अधिकारी, (सर्व)
५. विभागीय आयुक्त, कोंकण विभाग
६. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे
७. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई
८. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, ठाणे
९. कक्ष अधिकारी, कार्यासन - योजना-७/वित्त-१
१०. लेखाधिकारी, कार्यासन - योजना-२
११. निवड नस्ती, योजना-१ कार्यासन